**महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेच्या कार्यकारी समितीच्या उप समितीचे गठन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकःएसएसए-२०१८/प्र.क्र.२९५ भाग-२/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३० सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेच्या संस्थापन समयलेख व नियम (Memorandum of Association) मधील नियम ३४ नुसार कार्यकारी समितीची बैठक गरजेनुसार तथापि किमान ३ महिन्यातून एकदातरी घेण्याची तरतूद आहे. केंद्र शासनाने सर्व शिक्षा अभियान, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान व शिक्षक शिक्षण या तीन योजनांचे एकत्रिकरण करुन समग्र शिक्षा हा कार्यक्रम सन २०१८-१९ पासून सुरु केला आहे. समग्र शिक्षा योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद या स्वायत्त संस्थेद्वारे करण्यात येत आहे.

समग्र शिक्षा योजनेचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण इ. बाबींवर निर्णय घेण्याकरिता कार्यकारी समिती ही सर्वोच्च सक्षम समिती आहे. कार्यकारी समितीची विहित मुदतीत विविध कारणांमुळे बैठक घेणे शक्य होत नाही. त्यामुळे अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग तथा उपाध्यक्ष (कार्यकारी समिती) यांचे अध्यक्षतेखाली कार्यकारी समितीच्या उप समितीचे गठन करण्याचा विषय मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. सदर बाबीस दि.०१/१२/२०१८ रोजीच्या ६५ व्या बैठकीत मुद्दा क्रमांक ९३३ अन्वये व दिनांक १९/०८/२०१९ रोजीच्या कार्यकारी समितीच्या ६८ व्या बैठकीत मुद्दा क्रमांक ९५६ अन्वये उपसमिती गठीत करण्यास मंजुरी प्राप्त झाली. त्यानुषंगाने कार्यकारी समितीच्या उप समितीचे गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग तथा उपाध्यक्ष (कार्यकारी समिती) यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे कार्यकारी समितीच्या उप समितीचे गठन करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेच्या कार्यकारी समितीच्या गठीत उपसमितीची रचना: -

| अ.क्र. | विभाग | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५ | संबधित विषयाशी निगडित विभागाचे सचिव, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६ | संबधित विषयाशी निगडित शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य पुणे. | सदस्य |
| ७ | राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई. | सदस्य सचिव |

२. कार्यकारी समितीच्या उप समितीची बैठक उपसमितीच्या अध्यक्षांच्या मान्यतेने आयोजित करण्यात यावी व उपसमितीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाना कार्यकारी समितीच्या लगतच्या बैठकीत कार्योत्तर मंजूरी घेण्यात यावी. तथापि, महत्वाचे धोरणात्मक व तत्सम निर्णय कार्यकारी समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

३. **उपसमितीची कार्ये:-**

१) समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचे नियोजन करणे.
२) कार्यक्रमाच्या अमलबाजवणीसाठी समितीपुढे आलेल्या प्रस्तावाबाबत निर्णय घेणे.
३) कार्यकारी समितीच्या निर्णयानुसर अंमलबजावणी करण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक यांना मार्गदर्शन करणे.
४) कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचे सनियंत्रण करणे.
५) उपसमितीने घेतलेल्या निर्णयास कार्यकारी समितीच्या लगतच्या बैठकीत कार्योत्तर मान्यता घेणे.

४. ज्यावेळी अपर मुख्य सचिव व राज्य प्रकल्प संचालक ही एकच व्यक्ती असेल त्यावेळी या समितीचे सदस्य सचिव म्हणून राज्य प्रकल्प समन्वयक किंवा सह संचालक (प्रशासन) हे काम पाहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००११७०६४०४५२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.10.01 17:07:28 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
९) उप सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

१२) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१६) उप सचिव (विद्यार्थी विकास), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) अवर सचिव, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) मंत्रालयीन सर्व विभाग
२०) निवड नस्ती (एस.डी.१).